रत्नागिरी जिल्ह्यातील मंडणगड व दापोली तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग रस्ता प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२३/प्र.क्र.४३/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- १० एप्रिल, २०२३.

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोंकण यांचे पत्र जा.क्र./मुअ(को)/रेखाचित्र शाखा/दर्जोन्नती-१०९/२२६९, दिनांक २३/०७/२०१९.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोंकण यांनी संदर्भाधिन पत्रान्वये रत्नागिरी जिल्ह्यातील मंडणगड व दापोली तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग रस्ता, प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी सदर रस्ता दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्याचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, रत्नागिरी यांचा ठराव विचारात घेता, सदर रस्ता प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोंकण यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, रत्नागिरी यांचा ठराव विचारात घेऊन रत्नागिरी जिल्ह्यातील मंडणगड व दापोली तालुक्यातील खालील इतर जिल्हा मार्ग रस्ता प्रजिमा म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | पालवणी वेरळ उन्हवरे तोंडली विरसई खरवते रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ०७ | (०/०० ते १४/२५०) १४.२५० कि.मी. | १४.२५० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१११ |
| | **एकूण** | | | **१४.२५० कि.मी.** | |

परिणामी रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील रत्नागिरी जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **१४.२५० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी ( २०६०.७२५ + १४.२५०) म्हणजेच **२०७४.९७५ कि.मी.** इतकी तसेच इतर जिल्हा मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत १४.२५० कि.मी. ने घट होवून एकूण लांबी (११३५.८१०-१४.२५०) म्हणजेच **११२१.५६० कि.मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०४१११२१०२४५११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2023.04.11 12:15:50 +05'30'

**( ग. सं. कचरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, मुंबई.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोंकण, मुंबई. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, रत्नागिरी. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

**प्रत :-**

१) उप सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई.
२) जिल्हाधिकारी, रत्नागिरी.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी.
४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, चिपळूण.
५) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
६) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
७) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
८) निवडनस्ती.